ई-साहित्य प्रकाशन

वर्ष दुसरे-अंक २३

१६ ऑगस्ट २०१०



प्यारे दरसन दिज्यो आय,
तुम बिन रह्यो न जाय ।।
जल बिन कमल, चंद बिन रजनी ।
ऐसे तुम देख्यां बिन सजनी ।।
आकुल व्याकुल फिरुं रैन दिन,
बिरह कलेजो खाय ।।
दिवस न भूख, नींद नहिं रैना,
मुख सूं कथत न आवै बैना ।।
कहा कहूं कुछ कहत न आवै,
मिलकर तपत बुझाय ।।
क्यूं तरसावो अंतरजामी,
आय मिलो किरपाकर स्वामी ।।
मीरां दासी जनम जनम की,
पडी तुम्हारे पाय ।।

**संत मीराबाई**



# मीरा

: संपादिका :

भारती सरमळकर (मुंबई)

: अतिथी संपादिका :

अनुजा (स्वप्नजा) मुळे (पुणे)

: सह संपादक :

सोनाली घाटपांडे (पुणे)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

# संपादकीय..........

लहाणपणापासुनच “ति”चं व्यक्तिमत्व मनाला भुरळ घालायचं आणि विचारही करायला लावायचं.... इतकं निस्सिम, निस्वार्थ प्रेम कधी कुणी कुणावर करु शकतं का? जसजशी मोठी होत गेले “ति”च्याबद्दलच आकर्षण आणखीनच वाढत गेलं. जेव्हा कधी प्रेमावर काही ऎकायचे, वाचायचे, बघायचे मनात “ति”चाच विचार यायचा. प्रेम करावं तर “ति”च्यासारखं... कृष्णाला न पाहता, न स्पर्शता “ति” त्याची झाली.... हे असं प्रेम असू शकतं का? हो... जेव्हा जेव्हा मी “ति”ला पाहते तेव्हा तेव्हा माझा प्रेमावरचा विश्वास आणखी दृढ होत जातॊ. न कसली अपेक्षा न कसले बंध आणि तरिही एक अतुट सुंदर नात “ति”ने जॊडलं त्या बास-याशी..... महाराणी असुनही “ति”ने श्वेत वस्त्र धारण केलीत त्या मुकुंदासाठी....त्याच्यावर असलेल्या प्रेमासाठी....हातात एकतारी घेऊन ती गात होती फक्त आणि फक्त त्या सावळ्याला.... मनामनात हरि जागवला त्या प्रितवेड्या जोगिणीने आणि विषाचा प्याला ही प्याली त्या श्यामल कृष्णासाठीच......

ह्या “ति”च्या जगावेगळ्या अद्‌भुत नात्याला, प्रेमाला आणि “ति”ला आज कवितांद्वारे सर्व रसिक वाचकांपर्यंत आणावसं मला वाटलं.... हा एक छोटासा प्रयत्न आहे “ति”ला थॊडसं आणखी जाणुन घेण्याचा, “ति”च्या इंचभर जवळ जाण्याचा, “ति”च्या प्रितीला, त्या नात्याला पुन्हा एकदा कवितांतून अनुभवण्याचा, जगण्याचा.... “ति”च्या बद्दलचं हे आकर्षण असच कायम राहिल... आणि जेव्हा कधी असा निस्सिम, निरागस, निस्वार्थ प्रेमाचा ओलावा ह्या मनाला स्पर्शुन जाईल तेव्हा तेव्हा त्या प्रितवेडया जोगिणीची आठवण नक्किच येईल.....

**भारती सरमळकर**

संपादिका - मुंबई

# अतिथी संपादिकेची ऑोळख.........

मराठी कविता समुहावर काही महिन्यांपुर्वी एक नविन नाव दिसलं, अनुजा (स्वप्नजा) मुळे. मग मी तिच्या कविता वाचु लागले. शब्दसंपत्ती, वेगवेगळे विषय, लयबद्ध कविता ह्याने फारच कमी वेळात हि पुण्याची संगणक अभियंता मराठी कविता समुहावर लोकप्रिय झाली. मुख्यत्वेकरुन कृष्णावर तिने जो धागा मराठी कविता समुहावर सुरु केलेला त्याला उदंड प्रतिसाद मिळाला, इतका की अनुजाचं लिखाण वाचुन त्याहुन प्रेरणा घेऊन बरेच जण त्या धाग्यावर सुंदर काव्य लिहु लागले. अशी ही अनुजा मुळे आज त्याच समुहाची एक महत्वाची जबाबदार नियंत्रक आहे.

अनुजाला कवितांची आवड अगदी पहिल्यापासुनच होती, ती म्हणते की आई घरात सतत काही ना काही ना सारखी गुणगुणत असायची त्यामुळे ब-याच कविता माझ्या तोंडपाठ आहेत. मोठी झाले आणि इंटरनेटसारखं जग डोळ्यासमोर आलं, तिथेच तिची आणि मराठी कविता समुहाची ओळख झाली आणि अवघ्या ८ महिन्यात ती जागा अगदी जिवाभावाची झाली. अनुजा कविता करायला लागली ते ही मराठी कविता समुहावर आल्यावरच.

अनुजाचे तसे आवडते कवी खुप आहेत पण संत ज्ञानेश्वरांची आर्तता तिला खुप स्पर्शुन जाते, तुकारामांचा आणि समर्थांचा रोखठोकपणा ही तिला भावतो आणि भटांच्या तरलतेतही तिला वाहून जायला होतं. कुसुमाग्रज आणि विंदा तिचे आवडते कवी तर संदिप खरे तिला जवळचा वाटतो. स्वभावाने अगदी मोकळ्या असणा-या अनुजाला कविताही वृत्तबद्ध लिहिता येत नाही असं ती स्वतः अगदी प्रांजळपणे सांगते पण यमकात लिहिणे तिला जास्त आवडते. मुक्त छंदही आवडतो. कविता जी काळजाला हात घालते ती मला प्रिय आहे... अशी साधी आणि सुंदर विचारसरणी असलेली ही अनुजा मुळे आज आपल्या ह्या नेटाक्षरीच्या अंकाची अतिथी संपादिका आहे. नेटाक्षरीच्या कुटुंबात सामिल झाल्याबद्दल तिचे संपूर्ण टिमकडुन मनःपुर्वक आभार आणि पुढ्च्या यशस्वी वाटचालीकरिता खुप खुप शुभेच्छा !!!

**टिम नेटाक्षरी**

# एक मीरा अतिथी संपादिकेच्या मनातली.......



"मीरा" हे दोन शब्द उच्चारले तरी मनभर भक्तीचं वारं उधाणुन जातं. मीरा म्हणाली कि आठवते पांढरे शुभ्र प्राजक्ती वस्त्र आणि विरागी एकतारी, कान्हा म्हणत विलग होणारे ओठ आणि कृष्ण म्हणतच मिटणारे ओठ. . .

मीरा एक राजकन्या, वैभवाच्या राशीत लोळणारी पण कमलदलाप्रमाणे निरिच्छ. . . लहानपणापासुनच इतकी संवेदनशील कि आई ने गमतीने म्हणलेले "ये कान्हाजी है ना यही है तुम्हारा दुल्हा" हे शब्द तिने आयुष्यभर जपले, जाणले आणि जगले. . . त्याक्षणापासुन तिने "मेरे तो गिरधर गोपाल दुसरो न कोई." असे म्हणतच आयुष्याचा जोगिया सुरु केला. . ती हसली कृष्णासाठी, ती सजली मनमोहनासाठी, ती रडली त्या कान्हासाठीच आणि प्राणही दिला त्या जग्गनाथासाठीच. . . ती तासनतास आपल्या कृष्णसख्याशी गप्पा मारत, त्याच्यासाठी गाणी म्हणत, त्याच्यासाठी नाचतही.

या अस्तित्वाच्या मायेमध्ये मीरा मात्र सर्वपार झाली होती. .तिची भक्ती निर्गुण होती तिला कृष्ण अस्तित्व मुर्तीत नकोच होतं. ते तिला स्वत:भोवती जाणवत होतं इतकी ती कृष्णमय झाली होती तिच्याच एका भजनात ती म्हणते "जनम से ही ईस व्याकुल मन मे, एक प्यास अजीब समाई है । मे भी बनु एक दिन पिया कि प्यारी यह तुझसे दुहाई है ।" तीच जन्म ध्येयच कृष्णमय होणं आणि कृष्णरुपात विरघळुन जाणं हे होतं.

कृष्णाची राधा ही प्राणसखी असली तरी मीरा कृष्णाचच भक्तिने मढ़लेलं रुप होतं. तिने आपल्या प्रेमातुन ख-या प्रेमाची कसोटी दाखवली जे अनंत असतं, निरपेक्ष असतं ते इतकं विशाल असतं कि प्रियकराचं रुप कसं आहे याचीही त्याला गरज नसते. कारण सगळीकडे तोच बाहु पसरुन कुशीत घ्यायला उभा असतो. प्रेमाची अत्युच्च पातळी मीरेने दाखवुन दिली. . . .

"जल जा जल जा इश्क मे जल जा जले कुंदन होय।

जलती आग लगाले माथे लागे तो चंदन होय. ।।"

हे मीरेने आपल्या वर्तनाने सिध्द केले, तिचं प्रेम बावनकशी सोन्याप्रमाणे तावून सूलाखुन निघालं होतं आणि विषाचा प्यालाही तिने हासत हासत ओठाला लावला जो कि तिच्या प्रेमामुळे तिच्यासाठी मोक्षाचं अमृत घेउन आला. . अशी ही कृष्णमय मीरा कृष्णाची भाससखी पण कृष्ण अस्तित्व स्वत:साठी जिवंत करणारी जोगीण. . .. मीरा !!!

**अनुजा (स्वप्नजा) मुळे**

अतिथी संपादिका

पुणे



मीरा निर्गुण निर्गुण
कान्हा साजण साजण
मीरा अबोल प्रेम
कान्हा उत्स्फुल गाणं

मीरा नदीची आर्तता
कान्हा समुद्र तिचा
मीरा प्रवाही प्रवाही
कान्हा चपल जलधारा

मीरा अबोल केदार
कान्हा भिजला गांधार
मीरा विरही सतार
कान्हा मारवा अलवार

मीरा रिमझिम धारा
कान्हा पाऊस कोसळणारा
मीरा शुभ्र चांदवा चांदवा
कान्हा नक्षत्रांचा ठेवा

मीरा शांत मनगाभारा
कान्हा नंदादीप तेवणारा
मीरा प्रकाश प्रकाश
कान्हा श्वास अंतरिचा

मीरा वेदना वेदना
कान्हा मुक संवेदना
मीरा मखमली दुःख
कान्ह हळवी भावना

मीरा विषाचा प्याला
कान्हा जहर जहर
मीरा निळसर सावळा
अवघी बनली कि कान्हा

**अनुजा (स्वप्नजा) मुळे**
अतिथी संपादिका
पुणे



काळजातल्या एकतारीला
सुचला एकच सूर..।
डोळ्यांमधल्या यमुनेलाही
नकळत आला पूर..।
ती हाक मारते,
साद मागते,
अन, वदते
कान्हा-कान्हा. . .
तिला तिचा तो
“कृष्ण सावळा”
कुणीतरी आणुनी द्या ना ॥

त्या श्यामनिळ्याच्या
बासरीभवती,
जमले जरी गोकुळ..।
परी कुणा कळेना
तो सजिवत आहे,
तिच्या ढोह्याची ओल..।
तिने श्वासांची
‘जपमाळ’ सोडुनी
त्यातही ओवला “कान्हा”
तिला तिचा तो,
“कृष्ण सावळा”
कुणीतरी आणुनी द्या ना ॥

तीने जहर लावले
त्याच्यासाठी,
अलगद रे, ओठास..।
“त्या”च क्षणाला,
कृष्ण म्हणाला,
यमुनेच्या काठास. .
“या तुझ्या कुशीतुन
तिच्याच साठी
“कृष्ण” येऊ दे पुन्हा. .!!”
अरे!, तिला तिचा तो,
“कृष्ण सावळा”
कुणीतरी आणुनी द्या ना ॥

ती मागत नाही
कृष्ण तुम्हाला,
वा कृष्णाची मुर्ती. . .।
ती सांगत राही
कृष्ण तुम्हाला,
अन, कृष्णाची भक्ती. . ।
ती पवित्रता,
ते प्रेम निर्मळ,
तुमच्याही ह्रदयी जाणा
त्या मीरेला
केव्हाच मिळाला “ति”चा
“कृष्ण-सावळा”, “कान्हा”

सचिन काकडे
मुंबई



मन तुझिया रुपात न्हाले
मन गोविंद गोविंद बोले. . ।
तु शामसखा मी कृष्णप्रिया
तव नामाचे मी रंग ल्याले. . ।

कोणी चोर बोले कोणी द्वाड
ना गोपींना कशाची चाड,
मी जपले मन-मंदिरी
तिथे तुझाच नाद चाले. . ।

तु वरल्या कैक नारी
तुज भाळली राधा बावरी,
मज हाती तुझी एकतारी
सुर तुझेच तिच्यात आले. . ।

तव ध्यान असे लागता
मज विसर पडे जगाचा,
मीरा उरते ना उरते ही काया
मीरा कृष्णमयी, कृष्ण मीरामयी जाहले. . ।
मन तुझिया रुपात न्हाले. . . ॥
मन गोविंद गोविंद बोले . . . ॥

दिपक साळुंखे
पुणे



"गिरधर" मेरे माया रचेता
गोपीयोंसंग रास रचाये।
मेरी भक्ति मै ही जानू
मीरा मन ही मन मुसकाये. . . ॥

ग्वाल बालन संग लैके
"हरी" चले वृंदावन मे।
सांज सवेरे हर्षित सारे
मीरा मन ही मन मुसकाये. . . ॥

"बन्सीधर" कि मधुर सानिका
मन लुभाये रुप सलोना।
सात सुरोंमे विश्व समाया
मीरा मन ही मन मुसकाये. . . ॥

राधा रंग रंगे "श्याम"
मुख सलोना रंग सावला।
कोई ना जाने बात कैसी
मीरा मन ही मन मुसकाये. . . ॥

नटखट "कान्हा" मोहे सताये
चोरी उसकी पकडी जाये।
उसके रंग मे रंगी मै
मीरा मन ही मन मुसकाये. . . ॥

**सोनाली घाटपांडे**
(पुणे)



मंद तेवते समई
गाभा-यातील ईश्वरापाशी. . !!
मीरा वेडी कृष्णापायी
अवघे मन धाव घेई. . !!

दुर गुंजतो मंजुळ सुर
कृष्णा तुझ्या पाव्याचा. . !!
अधीर मीरा होई
ध्यास तुला ऐकण्याचा. . !!

मनोमनी ती नित्य भजते
तुझीच सावळी मुर्ती रे. . !!
गोप-गोपिका हेटाळती परी
स्वप्नी तिच्या तुच रे. . !!

श्यामल शांत रुप तुझे
मीरेच्या नयनी सामावले. . !!
निःसिम ओढ पाहुनी तिची
प्रभु तुझे लोचन ही पाणावले. . !!

सुप्रिया चापेकर
पुणे



म्हणती किशन कन्हैया
का रे छळतो असा
दाखविसी रंग कैसा?
मी तुझीच ना रे मीरा . . . .!!

किती गवळणी या
किती या गोपिका
मज गवसशिल का?
मी तुझीच ना रे मीरा. . . .!!

खेळसी खेळ कधी
दाखविसी अनेक लीला
घडविसी महाभारता
मी तुझीच ना रे मीरा . . . .!!

राधेच्या राधेया
देवकिच्या नंदना
यशोदेच्या कान्हा
मी तुझीच ना रे मीरा . . . .!!

हट्ट पुरव एकदा
बनशील का कधी तु
मुरारी या मीरेचा ?
सांग ना. . .
मी तुझीच ना रे मीरा . . . .!!

साक्षी सुर्वे
मुंबई



वाळुत अचानक दिसते उठले पाउल ।
अन तशात येते दुर तुझी रे चाहुल॥

मी अशीच वेडी थांबुनी पाहत राही ।
तु कुठे रे ? का दिसत मला तु नाही ?॥

मी मिटले डोळे, मन ही आता मिटले ।
ईच्छा ही निमाल्या, बंधन अवघे सुटले ॥

संपला अखेरी आयुष्याचा शाप ।
भोगले पुण्य, भोगुन संपले पाप ॥

ही एकच आता आस उरे ह्रदयाशी ।
तु उचलुन घ्यावे मातेसम उदराशी ॥

कुणी म्हणो बावळी, करोत पुजा कोणी ।
मी तुझीच रे, मी तुझी मीरा राणी ॥

अभय भावे



हळव्या तुझ्या कृपेने मी कृष्ण झालो मीरे
निळ्या विषात मी ही सावळालो मीरे

दोह्यांत गुंफलेला मी सूर झालो मीरे
एकतारी ऐकताना नुपूर झालो मीरे

राधिकेशी नाव माझे जोडलेस मीरे
प्रित तुझी कैसी बंध तोडलेस मीरे

श्वेत श्वेत वस्त्रांतुन उष्ण झालो मीरे
हळव्या तुझ्या कृपेने मी कष्ण झालो मीरे

**मकरंद सखाराम सावंत**
मुंबई



किसनाचा पावा. .
सप्तसूर छेडी ।
सप्तरंध्र स्वरतात. .
सप्तजन्म वेडी ।

"मीरा" श्वेत पांघरुण
तल्लिन-तल्लिन
तीची एकतारी
तीला हवीशी एक बेडी ।

पाव्या तुला. . सूर सात
सात हृदयाचे तळ ।
माझी तार एकटीशी
जन्मांतरीचे बळ ।

**प्राजक्त देशमुख**
नाशिक




रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

------------------------